सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने.
मागणी क्र.एल-२,"२०५३ ,जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६)
(१) पंच,सरपंच, सचिव,अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण-(०२)
राज्यक्षेत्र, ३१- सहाय्यक अनुदान (वेतन), ३६-सहाय्यक अनुदान(वेतनेतर)
(संकेतांक क्र. २०५३ ०५७ ४)(योजनेत्तर)(दत्तमत)
(दुसरा हप्ता) (माहे जुलै ते सप्टेंबर, २०२०)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुपं-२०२०/प्र.क्र. ३६ /आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
दिनांक : २८ ऑगस्ट, २०२०

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग- प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३
२) शासन परिपत्रक क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग-प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८.
३) शासन परिपत्रक क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग -प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४) शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्रमांकः अनुपं-२०२० /प्र.क्र.३६/आस्था-१५, दिनांक १३ मे, २०२०.

शासन निर्णय-

सन २०२०- २१ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र.एल-२,मुख्य लेखाशिर्ष "२०५३ ,जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच,सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३१-सहाय्यक अनुदान, ३६-सहाय्यक अनुदान(वेतन) (संकेतांक क्र.२०५३ ०५७४) (योजनेतर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांसाठी वेतनेतरसाठी ३६ .४३ लक्ष ( रु. छत्तीस लक्ष, त्रेचाळीस हजार फक्त) व वेतनासाठी रुपये ३११.२३ लक्ष (तीन कोटी, अकरा लक्ष, तेविस हजार ) असे एकूण रुपये ३४ ७.६६ लक्ष ( तीन कोटी सत्तेचाळीस लक्ष , सहासष्ट हजार फक्त ) इतकी तरतूद अर्थसंकल्पित केली आहे.

२. ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांसाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता माहे एप्रिल ते जून , २०२० या कालावधीकरिता वेतनासाठी रु . ४६.६८४५ लक्ष (रु. सेहेचाळीस लक्ष, अडुसष्ट हजार चारशे पन्नास फक्त ) अनुदान दिनांक १३ मे, २०२० च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आले आहे.

३. आता, माहे जुलै ते सप्टेंबर, २०२० या कालावधीकरिता वित्त विभागाने अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणाली ( BEAMS) या प्रणालीवर अर्थसंकल्पिय तरतुदीच्या ४५ % निधी वेतनाकरिता वितरित करण्यास उपलब्ध करुन दिलेला आहे. ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रे यांना वेतनाकरिता रु. ९३.३६९० लक्ष ( रु. त्र्याण्णव लक्ष, छत्तीस हजार नऊशे फक्त ) इतका निधी दुसरा हप्ता म्हणून वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर अनुदान विहित अटी व शर्तींच्या अधीन राहून या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे वितरित करण्यात येत आहे. सदर तरतूद सर्व संबंधित उपायुक्त ( आस्था),विभागीय आयुक्त कार्यालय यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्था), हे काम पाहतील.

५. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण - ११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने सर्व संबंधित उपायुक्त (आस्था) यांनी सदर पंचायत राज प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भात दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

६. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे , त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

७. हा खर्च मागणी क्र .एल-२,"२०५३, जिल्हा प्रशासन -०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच,सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३६-सहाय्यक अनुदान (वेतन) (संकेतांक क्र. २०५३ ०५७४) (योजनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो या लेखाशीर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा तसेच सदर खर्च त्याच लेखाशिर्षाखाली खर्च पडतो आहे, याबाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

८. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना संबंधित प्रशिक्षण केंद्रातील कार्यरत पदे व रिक्त पदे विचारात घेऊन वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. संबंधित प्रशिक्षण केंद्रास जुलै ते सप्टेंबर, २०२० या कालावधीत वेतन देयकांसाठी निधी कमी पडणार नाही

याची दक्षता घ्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतनेतर व वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे. याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

९. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना प्रचलित निकष वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाच्या दि. १६ एप्रिल, २०२० च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे संबंधितांनी काटेकोरपणे पालन करावे.

१०. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

११. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र. ६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००८१७११४३४८४५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Shashank Yashwant Barve

Digitally signed by Shashank Yashwant Barve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4f19736b62993d2c7e716a76cdcfdaa8a6a08fc2f15bfd41fed42ec7306bf1e8, cn=Shashank Yashwant Barve
Date: 2020.08.28 15:01:03 +05'30'

(शशांक य. बर्वे)

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. विभागीय आयुक्त, सर्व (प्रत्येकी २ प्रती)

२. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, कोंकण,पुणे,औरंगाबाद,नागपूर व अमरावती.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, कोंकण,पुणे,औरंगाबाद,नागपूर व अमरावती.
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
७. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, (सर्व) .
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास विभाग (२ जादा प्रतींसह)
११. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.

परिशिष्ट

| | माहे जुलै ते सप्टेंबर,२०२० या कालावधीतील दुसऱ्या हप्त्याचे वितरण दि. २८ ऑगस्ट, २०२० (रु. हजारात) | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | पंचायत राज प्रशिक्षण केंद्राचे नाव | वेतन | एकूण |
| १ | कोसबाड हिल, जि.पालघर | ८४८.८०९ | ८४८.८०९ |
| **अ)** | **विभागीय आयुक्त, कोकण** | **८४८.८०९** | **८४८.८०९** |
| २ | वर्ये, जि.सातारा | ८४८.८०९ | ८४८.८०९ |
| ३ | गारगोटी, जि.कोल्हापूर | ८४८.८०९ | ८४८.८०९ |
| ४ | गौडगांव, जि.सोलापूर | ८४८.८०९ | ८४८.८०९ |
| **ब)** | **विभागीय आयुक्त, पुणे** | **२५४६.४२७** | **२५४६.४२७** |
| ५ | मुरुड, जि.लातूर | ८४८.८०९ | ८४८.८०९ |
| **क)** | **विभागीय आयुक्त, औरंगाबाद** | **८४८.८०९** | **८४८.८०९** |
| ६ | हनुमान नगर, जि.नागपूर | ८४८.८०९ | ८४८.८०९ |
| ७ | मूल, जिल्हा चंद्रपूर | १२१९.२९९ | १२१९.२९९ |
| **ड)** | **विभागीय आयुक्त, नागपूर** | **२०६८.१०८** | **२०६८.१०८** |
| ८ | खिरोदा, जि.जळगाव | १०७.८३० | १०७.८३० |
| **इ)** | **विभागीय आयुक्त, नाशिक** | **१०७.८३०** | **१०७.८३०** |
| ९ | खामगांव, जि.बुलढाणा | १२१९.२९९ | १२१९.२९९ |
| १० | शिवाजीनगर, जि.अमरावती | ८४८.८०९ | ८४८.८०९ |
| ११ | पुसद, जि.यवतमाळ | ८४८.८०९ | ८४८.८०९ |
| **ई)** | **विभागीय आयुक्त, अमरावती** | **२९१६.९१७** | **२९१६.९१७** |
| | **अ)+ब)+क)+ड)+इ)+ई)** | **९३३६.९००** | **९३३६.९००** |

Shashank Yashwant Barve

Digitally signed by Shashank Yashwant Barve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4f19736b62993d2c7e716a76cdcfdaa8a6a08fc2f15bfd41fed42ec7306bf1e8, cn=Shashank Yashwant Barve
Date: 2020.08.28 15:01:50 +05'30'

( शशांक य. बर्वे )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.